राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द खेळाडूंना मानधन करिता निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निविप्र ४०१६ /प्र.क्र १९८ /क्रीयुसे -२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : १४ फेब्रुवारी, २०१७.

वाचा

१. शासन निर्णय समाजकल्याण सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्रमांक - सेनिवे -१०९१ / प्र.क्र.८२/क्रीयुसे -१,दिनांक १० जून, १९९३.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग , शासन निर्णय क्रमांक क्रीडायो २०१२/प्र. क्र.६४/१२ /क्रीयुसे-२, दि. २१ डिसेंबर, २०१२
३. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अ र्थसं - २०१६ / प्र.क्र ८९ / अर्थसं-३ ,दि.२०.०४.२०१६ .
४. शासन निर्णय क्रमांक : निविप्र ४०१६ /प्र.क्र १२९ /क्रीयुसे -२,दि.०१ ऑगस्ट २०१६.
५. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,पुणे यांचे पत्र क्र.निधी वितरण/वयोखेमानधन/२०१६-१७ / २७२ (१५०)/का-६ दि.१२.०१.२०१७.

**प्रस्तावना -**

राज्य / राष्ट्रीय / आंतरराराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द खेळाडूंना मानधन देण्याची योजना दि.१० जून, १९९३ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आली आहे. उपरोक्त संदर्भ क्र.०२ च्या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय / आंतरराराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द खेळाडूंना तसेच किताब प्राप्त कुस्तीगिरांना सुधारित मासिक मानधन देण्यात येते.

उपरोक्त संदर्भाधीन क्र.०५ च्या पत्रान्वये सन २०१६-१७ या वर्षामध्ये १२७ वयोवृध्द खेळाडूंना , एप्रिल २०१६ ते ऑक्टोबर २०१६ या कालावधी करीता मानधन अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता. त्या अनुषंगाने या योजनेतंर्गत सन २०१६-१७ मध्ये मंजुर रू.५४.५१ लक्ष इतक्या निधीच्या वितरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१६-१७ या वर्षाकरीता राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी केलेल्या नामवंत खेळाडूंना मानधन देण्याकरिता रु.३०.००लाख इतका अर्थसंकल्पित निधी पैकी रु. २४.०० लक्ष इतकी रक्कम वितरित करण्यात आली असुन सदर रक्कमेचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाले आहे. अर्थसंकल्पित रकमेतील उर्वरित रक्कम रु.०६.०० लाख आणि पुरवणी मागणीद्वारे प्राप्त झालेला निधी रु ४८.५१ लक्ष असा एकुण रु.५४.५१ लक्ष इतका निधी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च “मागणी क्र.ई-३,२२०४-क्रीडा व युवक सेवा-१०४ क्रीडा व खेळ (०८)(०२) राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी केलेल्या नामवंत खेळाडूना मानधन (२२०४ १६५८), ३१ सहायक अनुदाने वेतनेतर” या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. सदर योजनेअंतर्गत वयोवृध्द खेळाडूंना मानधन मंजूर करतांना संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयामधील मधील अटी व शर्ती लागू राहतील.

४. वित्त विभागाच्या दि.२०/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

४.१ . वित्त विभागाच्या दि.२०/०४/२०१६ च्या शासन परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

४.२. यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

४.३. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत गतवर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

४.४. दि.२४/०७/२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

४.५. परिपत्रकातील “अ” व “ब” ची पूर्तता होत आहे.

५. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२०/०४/२०१६ व दि.२४/०७/२०१५ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी आयुक्त / संचालक यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२०/०४/२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील परिच्छेद ७ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १,२,३,४,५,६,७व ८ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

हे शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ७०/व्यय-५ दि. २०.०१.२०१७ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२१५१२४४५०१३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=862038e0fbcf90998980c1f9241c4bdd9f61a60c9a06a5fe43c17f10b41e85f5, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2017.02.15 12:46:38 +05'30'

( कि.ल.संखे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा )यांचे खाजगी सचिव

२) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
७) सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा (संचालनालयामार्फत)
८) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी ( संचालनालयामार्फत )
९) निवडनस्ती, क्रीयुसे-२